**इचलकरंजी पॉवरलूम मेगा क्लस्टर लि.या प्रकल्पास सामुहिक प्रोत्साहन योजने अंतर्गत विशाल प्रकल्पाचा दर्जा देण्याच्या अनुषंगाने समिती स्थापन करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्र. संकिर्ण २०२३/प्र.क्र. ८० /टेक्स-५,**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक - ०६ एप्रिल, २०२३

**वाचा** - उद्योग ऊर्जा व कामगार विभाग क्र.एचपीसी२०२३/प्र.क्र.१३२/उद्योग-८ दिनांक ०५/०४/२०२३ रोजीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना -**

वाचा येथे नमुद मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या ९७ व्या बैठकीत इचलकरंजी पॉवरलूम मेगा क्लस्टर लि.या प्रकल्पास सामुहिक प्रोत्साहन योजने अंतर्गत विशाल प्रकल्पाचा दर्जा देण्याच्या अनुषंगाने समिती स्थापन करणेबाबत निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार इचलकरंजी पॉवरलूम मेगा क्लस्टर लि.या प्रकल्पास सामुहिक प्रोत्साहन योजने अंतर्गत विशाल प्रकल्पाचा दर्जा देण्याच्या अनुषंगाने समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती त्यानुसार खालील प्रमाणे समिती स्थापन करण्यात येत आहे.

**शासन निर्णय : -**

प्रस्तावनेतील माहिती विचारात घेता, इचलकरंजी पॉवरलूम मेगा क्लस्टर लि.या प्रकल्पास सामुहिक प्रोत्साहन योजने अंतर्गत विशाल प्रकल्पाचा दर्जा देण्याच्या अनुषंगाने समिती स्थापन करण्यात येत आहे.

सदर समितीची रचना खालील प्रमाणे असेल:-

१) प्रधान सचिव (उद्योग), उद्योग ऊर्जा व कामगार विभाग. - अध्यक्ष
२) सचिव (वस्त्रोद्योग) सहकार ,पणन व वस्त्रोद्योग विभाग. - सदस्य
३) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय,मुंबई. - सदस्य
४) आयुक्त (राज्य वस्तू व सेवा कर) माझगांव, मुंबई. - सदस्य
५) आयुक्त (वस्त्रोद्योग) वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर - सदस्य सचिव

समितीची कार्यकक्षा :-

सदर समिती इचलकरंजी पॉवरलूम मेगा क्लस्टर लि.या प्रकल्पास वस्त्रोद्योग घटकाने केलेल्या मागण्यांच्या अनुषंगाने (१) वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३ अंतर्गत भांडवली

अनुदान देणेबाबत तसेच (२) साप्रोयो २०१९ अंतर्गत पात्रता तपासून विशाल प्रकल्पाचा दर्जा देण्याविषयी, घटकाकडून आवश्यक ती कागदपत्रे प्राप्त करून घेवून वस्त्रोद्योग विभागाचे व उद्योग विभागाच्या समन्वयाने अभ्यास करून उच्चाधिकार समितीसमोर या विषयीचा अहवाल पुढील १५ दिवसात सादर करेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०४०६१५०८५००८०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

MADANE VISHAL
VISHWAS

Digitally signed by MADANE VISHAL VISHWAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=bb0ed28a897fc87f69fe8807b3d9428966ce3233edb83a20c38834c19f2e3793, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=CB16DB1CC002E115B709A8CA348A6483883493AAF53B7BE25836CDA1B57FF2DC, cn=MADANE VISHAL VISHWAS
Date: 2023.04.06 15:16:12 +05'30'

**(विशाल मदने)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :**

१. मा. मंत्री (वस्त्रोद्योग), महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
२. मा.मुख्य सचिव , महाराष्ट्र शासन , मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई
६. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय,मुंबई.
७. आयुक्त (राज्य वस्तू व सेवा कर) माझगांव, मुंबई.
८. आयुक्त (वस्त्रोद्योग) वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर